आषाढीवारी- २०२५

**आषाढी एकादशी निमित्त सोलापूर व सातारा जिल्हयांतून मार्गक्रमण करणाऱ्या विविध संतांच्या पालख्यांसोबत असणाऱ्या भाविकांना सोयी सुविधा पुरविण्यासाठी अतिरिक्त निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः तीर्थवि-२०२५/ई-११५५०६०/यो-११**

बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ, फोर्ट,

मंत्रालय, मुंबई - ४००००१

**दिनांक: ०६ जून, २०२५**

संदर्भ:-

(१) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि. प.सोलापूर यांचे पत्र जा.क्र.जिपसो/साप्रवि-२/ग्रांप/११६/२०२५, दि.०८.०४.२०२५.

(२) मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प. सातारा यांचे पत्र जा.क्र.ग्रापं/६(२)पा.सो/२०२५ दि. ०१.०५.२०२५.

प्रस्तावना :-

आषाढी वारी पालखी सोहळा-२०२५ निमित्त जिल्हा परिषद, सोलापूर यांनी संदर्भ क्र.१ च्या पत्राद्वारे, विविध पालख्यांसाठी तात्पुरते शौचालय व महिला स्नानगृह उभारणे, वॉटरप्रुफ मंडप व्यवस्था, जर्मन हँगर, कायमस्वरूपी आपत्ती व्यवस्थापन केंद्र व ड्रोन सुविधा, प्रचार प्रसिद्धी व जन जागृती व हिरकणी कक्षांतर्गत सुविधा अशा विविध सुविधांसाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. तसेच संदर्भ क्र.२ च्या पत्रान्वये जिल्हा परिषद, सातारा यांनी पालखी तळ, स्नानगृह, मंडप डेकोरेशन, पाणी शुद्धीकरण, स्वच्छता व इतर अनुषंगिक बाबींसाठी अतिरिक्त निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे. त्याअनुषंगाने जिल्हा परिषद, सोलापूर व जिल्हा परिषद, सातारा यांचेकडून प्राप्त मागणीनुसार निधी उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:-

आषाढी वारी पालखी सोहळा-२०२५ निमित्त सोलापूर व सातारा जिल्हयातून मार्गक्रमण करणाऱ्या विविध संतांच्या पालख्यासोबत असणाऱ्या भाविकांना मुक्कामाच्या ठिकाणी तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर आवश्यक सुविधा पुरविण्याच्या कामांकरीता, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजनेंतर्गत, जिल्हा परिषद, सालापूर यांना अतिरिक्त तरतुद **रु.४,८०,९०,०००/- (रु. चार कोटी ऐंशी लक्ष नव्वद हजार फक्त)** इतका निधी व जिल्हा परिषद, सातारा यांना **रु.५६,२६,५००/- (रु. छप्पन्न लक्ष सव्वीस हजार पाचशे फक्त)** इतका निधी उपलब्ध करून देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

सविस्तर तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

| | | | |
|---|---|---|---|
| **विशेष अतिरिक्त तरतूद** | | | |
| १. | जिल्हा परिषद, सोलापूर | तात्पुरते स्वच्छतागृह | रु.८५,००,०००/- |
| | | महिला स्नानगृह | रु.५०,००,०००/- |
| | | ३८ मुक्काम ठिकाणी वाटरप्रुफ मंडप व्यवस्था, जर्मन हँगर गुरसाळे येतील एकात्मिक सुविधा केंद्र अंतर्गत सुविधा उपलब्ध करणे. | रु.२,१५,९०,०००/- |
| | | कायमस्वरूपी आपत्ती व्यवस्थापन केंद्र व ड्रोन सुविधा | रु.८०,००,०००/- |
| | | प्रचार प्रसिद्धी व जन जागृती | रु.४०,००,०००/- |
| | | हिरकणी कक्षांतर्गत सुविधा | रु.१०,००,०००/- |
| **एकूण** | | | **रु.४,८०,९०,०००/-** |
| | | | |
| २. | जिल्हा परिषद, सातारा | पालखी तळ जमीन सपाटीकरण, मुरमीकरण करणे, पालखी तळ स्वच्छता/शौचालय उभारणी, तात्पुरते स्नानगृह उभारणे, मंडप डेकोरेशन लाइटिंग स्वागत कमान, पाण्याचे स्त्रोत शुध्दीकरण स्टँड पोष्ट, गटर नालेसफाई जंतूनाशक फवारणी, गावातील स्वच्छता व इतर अनुषंगिक कामे, पालखी स्वागत व निरोप ठिकाणी कक्ष उभारणे इत्यादी | रु.५६,२६,५००/- |
| **एकूण** | | | **रु.५६,२६,५००/-** |

२. सन २०२५-२६ या आर्थिक वर्षाकरिता पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास या योजनेंतर्गत, पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) (२५१५ २५२१) या लेखाशीर्षाखाली रु.१००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

३. सद्यस्थितीत २५१५ २५२१ लेखाशीर्षाखाली उपलब्ध तरतुदीतून मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर यांना मंजूर रकमेच्या ७५ % प्रमाणात रु.३,६०,६७,५००/- (रु.तीन कोटी साठ लक्ष सदुसष्ट हजार पाचशे) इतका निधी व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सातारा यांना मंजूर रकमेच्या ७५ % प्रमाणात रु.४२,१९,८७५/- (रु.बेचाळीस लक्ष एकोणीस हजार आठशे पंचाहत्तर ) इतका निधी याद्वारे वितरीत करण्यात येत आहे.

४. सदर निधी वितरीत करताना, ज्या कामांसाठी निधी उपलब्ध करून दिलेला आहे त्याच कामांवर खर्च करण्याची जबाबतदारी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर व सातारा यांची राहील. सदर सहायक अनुदानाच्या विनियोजनासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापाल कार्यालय, मुंबई व या विभागास सादर करावीत. वितरीत निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र व निर्मलवारीत (तात्पुरत्या शौचालयाची व्यवस्था व इतर सुविधा) या बाबीवर झालेल्या एकूण खर्चाचा सविस्तर तपशील शासनास सादर केल्यानंतर उर्वरित निधीचे वितरण करण्यात येईल.

५. सदर खर्च मागणी क्र.एल-०३ "२५१५-इतर ग्रामविकास कार्यक्रम-१९६, जिल्हापरिषदांना/जिल्हास्तरीय पंचायतीना सहाय्य-(००) (०७) पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर ग्रामीण तीर्थक्षेत्र विकास योजना (कार्यक्रम) (२५१५ २५२१) (योजनांतर्गत) दत्तमत ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षात खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.३२२/२०२५/व्यय-१५ दि. २९.०४.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. तसेच, सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र: अर्थसं-२०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि. ०७ एप्रिल, २०२५ अन्वये अटींची व शर्तीचे पालन करून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०६०६१११११५४९२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

KALU GONYA VALVI

Digitally signed by KALU GONYA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=714701FC3DB9C38A46F4CD82E1E450B51A9E92EEDE8C323934F82EDB538D3B20, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8C5D0F275C3D9A21DB07FECF7919C2D83796E88930D62D44E7A4A6D4CBEE7E0E, cn=KALU GONYA VALVI
Date: 2025.06.06 13:05:05 +05'30'

**(का. गो. वळवी)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा. उपमुख्यमंत्री (नगरविकास) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन व वित्त) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५. मा.मंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
६. मा.राज्यमंत्री (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,
८. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१,मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर,

९. विभागीय आयुक्त, आयुक्त कार्यालय, पुणे विभाग, पुणे,

१०.जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर व सातारा,

११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर व सातारा,

१२.मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर व सातारा,

१३. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर व सातारा,

१४. अवर सचिव, नियोजन विभाग, (का-१४४४) मंत्रालय, मुंबई-३२,

१५. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय १५,अर्थसं १६,अर्थसं १७) मंत्रालय, मुंबई ३२,

१६. कक्ष अधिकारी, कार्या- वित्त-१, ग्राम विकास विभाग,

१७.निवड नस्ती (का-यो-११).